**भविष्य निर्वाह निधीमधून अग्रिम मंजूर करताना /रक्कम काढून घेण्यास मंजुरी देताना मूळ वेतनात मूळ वेतनाच्या ५० % इतके महागाई वेतन विलीन करुन अग्रिमाची / रक्कमेची परिगणणा करण्याबाबत. -----**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांकः-भनिनि-१००५/५२८/प्र.क्र.३१/१३-अ,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांकः- ५ जुलै, २००५.

**परिपत्रकः-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.मभवा ११०४/प्र.क्र.५/सेवा-९, दि १९ जुलै २००४ अन्वये शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार दि. १ ऑगस्ट २००४ पासून राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचा-यांना त्यांच्या मूळ वेतनावर देय असणा-या एकूण महागई भत्त्यापैकी मूळ वेतनाच्या ५०% एवढा महागाई भत्ता त्यांच्या मूळ वेतनामध्ये विलीन करण्यात आलेला आहे. सदरचा महागाई भत्ता वेतनपत्रकामध्ये प्रत्यक्षात मूळ वेतनामध्ये न दर्शविता "महागाई वेतन" (Dearness pay (D. P.) म्हणून स्वतंत्रपणे दर्शविण्यात येतो. भविष्य निर्वाह निधीची परिगणना करण्यासाठी सदर महागाई वेतन हे मूळ वेतनामध्ये विलीन केल्याचे गृहीत धरुन त्याप्रमाणे वर्गणीची परिगणना करावी असे वित्त विभागाच्या उक्त शासन निर्णयात नमूद करण्यात आले आहे. या परिस्थितीत शासकीय कर्मचा-यांना महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमानुसार अग्रिम (परतावा रक्कम) मंजूर करताना किंवा निधीतून रक्कम काढण्यास (ना-परतावा) मंजूरी देताना, मूळ वेतनात महागाई वेतन (Dearness pay ) विलीन करुन ( मूळ वेतन + महागाई वेतन ) त्यानुसार अग्रिम / ना-परतावा रक्कम परिगणित करणे आवश्यक आहे. तथापि, या संदर्भात कोणत्याही विशिष्ट सूचना दिलेल्या नसल्याने सदरची रक्कम कशाप्रकारे परिगणित करावी याबाबत या विभागाकडे ब-याच विभागांकडून विचारणा होत आहे.

२. यासंदर्भात आता असे स्पष्ट करण्यात येते की, महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम १९९८, मधील तरतूदीनुसार वर्गणीदारांना अग्रिम (परतावा रक्कम ) मंजूर करताना किंवा निधीतून रक्कम काढण्यास ( ना-परतावा) मंजूरी देताना मूळ वेतनात महागाई वेतन (Dearness pay ) विलीन करुन ( मूळ वेतन + महागाई वेतन ) त्यावर अग्रिम /ना- परतावा रक्कम परिगणित करण्यात यावी.

हे परिपत्रक वित्त विभागाने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र :- २७७/२००५/सेवा-९, दि. २८/४/२००५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(दि.बा.दळवी.)
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतींसह ),
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-२ , महाराष्ट्र, नागपूर (१० जादा प्रतींसह ),
महालेखापाल ( लेखा परीक्षा)-१ , महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतींसह ),
महालेखापाल (लेखा परीक्षा)-२ , महाराष्ट्र नागपूर( १० जादा प्रतींसह ),
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणुक आयोग, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
भारतीय लेखा परीक्षा आणि लेखा विभाग, महालेखापाल( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र यांचे कार्यालय,भविष्य निर्वाह निधी शाखा जुनी.सी.जी.ओ. बिल्डींग, न्यू मरीन लाईन्स, १०१ महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२० (५० जादा प्रतींसह)
मुख्य लेखा परीक्षक, निवासी लेखे, कोकण भवन, नवी मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
ग्रामविकास विभाग/ नगर विकास विभाग/वित्त विभाग (कोषा- प्र-५),मंत्रालय, मुंबई.
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई ( २ प्रती ),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.
* **पत्राने.**

------